**सन २०१८-१९ मध्ये क्रॉपसॅप योजनेतंर्गत शेंदरी बोंड अळीस नियंत्रित करण्याच्या दृष्टीने उपाययोजना करण्याकरीता रु.१६९७.०८ लक्ष निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः किरोनी-१४१८/ प्र.क्र.५५(भाग-१)/४अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: ०१ सप्टेंबर, २०१८.

<u>वाचा :-</u>

१) क्रॉपसॅप व हॉर्टसॅप प्रकल्पांची एकत्रीत अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने कार्यपद्धती निश्चित करणेबाबत दि.७/३/२०१८ रोजी झालेल्या बैठकीच्या इतिवृत्ताचे पत्र जा.क्र./विप्र-७/क्रॉपसॅप १६-१७/प्र.क्र.१४/२७१/१८, दि.२०/०३/२०१८

२) क्रॉपसॅप प्रकल्पाच्या राज्यस्तरीय सुकाणू समितीच्या दि.११/०४/२०१८ रोजी झालेल्या बैठकीतील निर्णय

३) कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. किरोनी-१४१८/प्र.क्र.५५ /४-अे, दि.१९/०५/२०१८.

४) आयुक्त (कृषी) यांचे पत्र जा. क्र./विप्र-७/क्रॉपसॅप १८-१९/अनु.वा. / ५५२/१८, दि.२७/०७/२०१८.

<u>**प्रस्तावना:**</u>

सोयाबीन, कापूस, भात, तूर व हरभरा या प्रमुख पिकांवरील कीड व रोगांच्या व्यवस्थापनाच्या दृष्टीने सन २००९-१० ते २०१२-१३ दरम्यान राष्ट्रीय कृषि विकास योजनेतून आणि सन २०१३-१४ पासून नियमित राज्य योजनेतून कीड-रोग सर्वेक्षण व सल्ला प्रकल्प (क्रॉपसॅप) राबविण्यात येत आहे. सदर योजनेची उपयुक्तता लक्षात घेऊन क्रॉपसॅप योजनेच्या धर्तीवर आंबा, डाळींब, केळी, मोसंबी, संत्रा व चिक्कू या प्रमुख फळ पिकांसाठी सन २०११-१२ पासून राष्ट्रीय कृषि विकास योजनेतून हॉर्टसॅप प्रकल्प राबविण्यात येत आहे.

क्रॉपसॅप व हॉर्टसॅप प्रकल्पांची एकसमान कार्यपद्धती विचारात घेऊन दोन स्वतंत्र योजना न राबविता फळ पिकांचा क्रॉपसॅप योजनेमध्ये समावेश करण्याचा निर्णय क्रॉपसॅप योजनेच्या राज्यस्तरीय सुकाणू समितीच्या दि. ११/०४/२०१८ रोजीच्या बैठकीत घेण्यात आला आहे.

सन २०१८-१९ मध्ये या योजनेतंर्गत रु.४१४७.०८ लक्ष निधीस संदर्भाधिन दि.१९ मे, २०१८ अन्वये प्रशासकीय मान्यता त्याचप्रमाणे रु.१०.५० कोटी इतका निधी वितरीत करण्यास मान्यता दिली आहे. सन २०१८-१९ मध्ये या योजनेतंर्गत शेंदरी बोंड अळीस नियंत्रित करण्याच्या दृष्टीने उपाययोजना करण्याकरीता रु.२६४७.०८ लक्ष निधी पुरवणी मागणीद्वारे मंजूर करण्यात आला आहे. कृषि आयुक्तालयाच्या संदर्भाधिन दि.२७/०७/२०१८ च्या पत्रान्वये या योजनेकरीता रु.१६९७.०८ लक्ष इतका निधी वितरीत करण्याची विनंती करण्यात आली आहे. त्यानुसार सदर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

१. सन २०१८-१९ मध्ये शेंदरी बोंड अळीमुळे कापूस पिक क्षेत्राला झालेल्या नुकसानीला प्रतिबंध करण्याकरीता या योजनेतंर्गत शेंदरी बोंड अळीस नियंत्रित करण्याच्या दृष्टीने उपाययोजना करण्याकरीता रु १६९७.०८लक्ष (रुपये सोळा कोटी सत्त्याण्णव लक्ष आठ हजार फक्त) इतका निधी आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सन २०१८-१९ मध्ये शेंदरी बोंड अळीस नियंत्रित करण्याच्या उपाययोजना, क्रॉपसॅप योजनेच्या मार्गदर्शक सूचनेनुसार करण्यात याव्यात.

३. सन २०१८-१९ मध्ये शेंदरी बोंड अळीस नियंत्रित करण्याच्या दृष्टीने उपाययोजना करण्याकरिता रु १६९७.०८ लक्ष (रुपये सोळा कोटी सत्त्याण्णव लक्ष आठ हजार फक्त) वितरीत करण्यात येत असून तो योजनेच्या पुढील लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ करिता मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा-:

मागणी क्र. डी-३

२४०१, पीक संवर्धन,

१०२-अन्नधान्य पीके,

(००) (३०) पिकावरील किड-रोग सर्वेक्षण व सल्ला प्रकल्प

(२४०१ ९२४२) राज्य योजना

३३-अर्थसहाय्य

४. सदर योजनेंतर्गत मंजूर निधी आयुक्तालय स्तरावर कोषागारातून आहरीत करुन योजनेंतर्गत सहभागी संस्थांना वितरीत करण्यास तसेच, आयुक्तालय स्तरावरील खर्चासाठी सहाय्यक संचालक, लेखा-१, यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून आणि आयुक्त (कृषि) यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्याचप्रमाणे, आयुक्त (कृषि) यांनी सदर योजनेंतर्गत प्राप्त होणाऱ्या निधीचे आवश्यकतेनुसार जिल्हा निहाय वितरण करावे.

५. सदर योजनेंतर्गत वेळोवेळी उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या निधीच्या विनियोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र आयुक्त (कृषि) यांनी शासनास सादर करावे.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१९६/२०१८/व्यय-१, दि.२४/०८/२०१८ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९०११११४९२६४९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2018.09.01 11:52:46 +05'30'

**( श्रीकांत आंडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मंत्री (कृषि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२) मा. राज्य मंत्री (कृषि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४) मा.विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
६) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८) अपर मुख्य सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
९) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, अकोला.
११) संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
१२) सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१३) सर्व जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी
१४) महालेखाकार ( स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा), मुंबई.
१५) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य
१८) सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
१९) वित्त विभाग (कार्या. व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई
२०) निवड नस्ती ४-अे.